नगर दिवाणी व सत्र न्यायालयात नऊ अतिरिक्त न्यायालये स्थापन करण्यासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-०७१७/५०४/प्र.क्र.१६६/का-११.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०८ जून, २०१८.

**संदर्भः-** प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. देखभाल विभाग/१४९२/२०१७, दि. २३/६/२०१७.

**प्रस्तावना :**

नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथे नऊ अतिरिक्त न्यायालये स्थापन करण्यासाठी (नवीन न्यायालय कक्ष, न्यायाधीशाकरीता दालन व प्रसाधनगृह आणि कोर्टरूमचे नूतनीकरण) रू. २,०३,६९,२०२/- इतक्या रकमेची अंदाजपत्रके नगर दिवाणी व सत्र न्यायालयाने संदर्भिय पत्रान्वये निधी उपलब्धता व प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केलेली आहेत. त्यानुसार सदर खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथे नऊ अतिरिक्त न्यायालये स्थापन करण्यासाठी रु.२,१५,७३,५८८/-(अक्षरी रुपये दोन कोटी पंधरा लाख त्र्याहत्तर हजार पाचशे अठ्ठ्याऐंशी फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास/खर्चास खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | प्रस्तावित केलेली अंदाजित रक्कम रुपये | सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणित केलेली रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १) | नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई आवारातील बॅरेक्समधील बोर्ड विभाग व पोलीस कक्ष येथे नविन न्यायालय कक्ष, न्यायाधिशांकरीता दालन व प्रसाधनगृह करणे | २४,२०,५०७ | २५,३६,८७७ |
| २) | नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई आवारातील बॅरेक्समधील अपिल शाखा विभाग येथे नविन न्यायालय कक्ष, न्यायाधिशांकरीता दालन व प्रसाधनगृह करणे | २५,१४,९०५ | २६,३५,८१४ |

| | | | |
|---|---|---|---|
| ३) | नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई आवारातील बॅरेक्समधील पुस्तक बांधणी विभाग येथे नविन न्यायालय कक्ष, न्यायाधिशांकरीता दालन व प्रसाधनगृह करणे | २४,८१,५७५ | २५,८०,९९७ |
| ४) | नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई आवारातील बॅरेक्समधील वाचनालय व अनुमोदन विभाग व शिवडी अभिलेखा विभाग बांधणी विभाग येथे नविन न्यायालय कक्ष, न्यायाधिशांकरीता दालन व प्रसाधनगृह करणे | २४,१४,२४४ | २५,१०,९६८ |
| ५) | नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई आवारातील बॅरेक्समधील दवाखाना व ड्रायव्हर कक्ष येथे नविन न्यायालय कक्ष, न्यायाधिशांकरीता दालन व प्रसाधनगृह करणे | २४,३९,५०४ | २५,२१,६०३ |
| ६) | नगर दिवाणी व सत्र न्यायालय मुंबई येथील मजल्यावरील Conversion & Decree Deptt च्या कोर्ट रूमचे नुतनीकरण करणे | २०,९४,०३९ | २२,८२,५०२ |
| ७) | नगर दिवाणी व सत्र न्यायालय मुंबई येथील कोर्ट रूम क्र.३८ चे नूतनीकरण करणे | १७,०४,८०८ | १८,५८,२४१ |
| ८) | नगर दिवाणी व सत्र न्यायालय मुंबई येथील दुसऱ्या मजल्यावरील Conversion & Account Deptt च्या कोर्ट रूमचे नुतनीकरण करणे | २४,०१,०५६ | २६,१७,१५१ |
| ९) | नगर दिवाणी व सत्र न्यायालय मुंबई येथील दुसऱ्या मजल्यावरील Conversion & Account Deptt च्या लगतच्या रूमचे नुतनीकरण करणे | १८,९८,५६४ | २०,२९,४३५ |
| | एकूण | २,०३,६९,२०२ | २,१५,७३,५८८ |

२. यावरील खर्च मागणी क्र.जे-१, २०१४ न्यायदान, १०५, दिवाणी व सत्र न्यायालये, (०१)मुंबई शहर दिवाणी व सत्र न्यायाधीश, (०१)(०१) मुंबई शहर दिवाणी व सत्र न्यायाधीश (अनिवार्य) (२०१४ ०१६३) २७ लहान बांधकामे या लेखाशीर्षामधून पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध होणाऱ्या निधीमधून भागविण्यात यावा. सदर प्रकरणी निधीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. सदर प्रकरणी तांत्रिक मान्यतेच्या अनुषंगाने तांत्रिक रक्कम वाजवी राहील याबाबतची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रचलित कार्यपध्दतीचा अवलंब करुन ई-निविदा प्रक्रिया सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय व तांत्रिक मान्यतेच्या अनुषंगाने इतर विहीत नियमानुसार अनुषंगिक सर्व कार्यवाही पूर्ण करावी. आणि, वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील नियम क्र. २७(२)(अ) मधील तरतूदीचेही पालन करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५७६/ इमा-२, दि.१०/७/२०१७ व अनौपचारीक संदर्भ क्र.२९/२०१८/अर्थ-२, दि.२६/३/२०१८ अन्वये तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२ दि.१७.४.२०१५,मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८,भाग-पहिला,उप विभाग- तीन,अनुक्रमांक ४,परिच्छेद क्र.२७(२)(अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६१११२४९०९०३१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Santosh
Sampatti
Navagire

Digitally signed by Santosh Sampatti Navagire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Santosh Sampatti Navagire
Date: 2018.06.11 12:53:10 +05'30'

**( सं.सं.नवगिरे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
२. प्रबंधक(निरीक्षणे-२), उच्च न्यायालय (अ.शा), मुंबई.
३. प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई.
४. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
७. विधि व न्याय विभाग, कार्या-२३ व २४.
८. निवडनस्ती/ कार्या-११.

*********************